**राज्यात किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेखाली रब्बी पणन हंगाम २०२०-२१ पासून गहू या पिकासाठी विकेंद्रित खरेदी योजना (Decentralised Procurement Scheme) लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- विकेंख-१०२०/प्र.क्र.७५/ना.पु.२९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०१ जुलै, २०२०

**वाचा :-**

१) केंद्र शासनाच्या अन्न व सार्वजनिक वितरण विभागाचे पत्र क्र.७(१)/२०२०-Py-१, दि.०८.०५.२०२०.
२) केंद्र शासनाच्या अन्न व सार्वजनिक वितरण विभागाचे पत्र क्र.७(८)/२०२०-Py-१, दि.३०.०६.२०२०.

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाची किमान आधारभूत किंमत खरेदी योजना ही राज्य शासनामार्फत राबविण्यात येते. सदर योजना शेतकऱ्यांना हमी किंमतीपेक्षा कमी किंमतीने (डिस्ट्रेस सेल) धान्य विकावे लागू नये, म्हणून राबविण्यात येते. त्यासाठी राज्य शासनाने नियुक्त केलेल्या अभिकर्ता संस्थांमार्फत (बिगर आदिवासी क्षेत्रात महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई **(Markfed)** व आदिवासी क्षेत्रात, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक **(TDC))** यांच्यामार्फत राज्यात खरेदी प्रक्रिया राबविण्यात येते. महाराष्ट्र राज्यात केंद्र शासनाची नोडल एजन्सि म्हणून भारतीय अन्न महामंडळ काम पहाते. सदर योजनेंतर्गत खरेदी करण्यात येणारा गहू भारतीय अन्न महामंडळाकडे जमा करण्यात येतो.

मागील तीन-चार हंगामांमध्ये राज्यात विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत गव्हाची खरेदी झालेली नाही. तथापि रब्बी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये कोविड-१९ या आजाराच्या पार्श्वभूमीवर आदिवासी विकास महामंडळ तसेच महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ यांच्याकडून गहू खरेदीची मागणी होत होती. त्या आधारावर केंद्र शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार उपरोक्त संदर्भीय पत्रान्वये गहू खरेदी विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत (Decentralised Procurement Scheme) करण्यात येईल, या अटीवर राज्यास गव्हाच्या खरेदीची परवानगी प्राप्त झाली आहे.

त्यानुसार रब्बी पणन हंगाम २०२०-२१ पासून विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत (Decentralised Procurement Scheme) गहू खरेदी करण्याबाबत केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशास अनुसरुन तसेच सदर योजना संपूर्ण राज्यात राबविण्यातबाबत राज्य मंत्रीमंडळाच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार गहू खरेदीसाठी विकेंद्रित खरेदी योजना राज्यात राबवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

केंद्र शासनाने संदर्भाधीन पत्रान्वये सूचित केल्यानुसार रब्बी पणन हंगाम २०२०-२१ पासून किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत राज्यात गहू या पिकासाठी विकेंद्रित खरेदी योजना (Decentralised Procurement Scheme) संपूर्ण राज्यात राबविण्याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

१) राज्यात रब्बी पणन हंगाम २०२०-२१ पासून किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत गहू या पिकासाठी विकेंद्रीत खरेदी योजना संपूर्ण राज्यासाठी लागू करण्यात येत आहे.

२) चालु आर्थिक वर्षात (२०२०-२१) सदर योजनेस येणाऱ्या रु.३६.९७ कोटी इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

३) विकेंद्रीत खरेदी योजनेचा स्विकार करताना गहू खरेदीची जबाबदारी प्रचलित पध्दतीनुसार आदिवासी विकास महामंडळ, नाशिक व महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई या दोन अभिकर्ता संस्थांवरच कायम ठेवण्यात येत आहे. या संपूर्ण प्रक्रियेवरील संनियंत्रणाची जबाबदारी जिल्हा पुरवठा यंत्रणेची राहील.

४) राज्यातील धान खरेदीसाठी NeML NCDEX Group Company च्या ऑनलाईन प्लॅटफॉर्मचा वापर करण्यात येत आहे. त्यास यापुर्वी मा.मंत्रीमंडळाची मान्यता घेण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर गहू खरेदीसाठीही NeML NCDEX Group Company च्या ऑनलाईन प्लॅटफॉर्मचा वापर करण्यात यावा.

५) यासाठी लागणारे अधिकचे मनुष्यबळ तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी तत्वावर किंवा प्रतिनियुक्तीद्वारे प्राप्त करुन घेण्यात यावे.

६) यासाठी केंद्र शासनाकडून मिळणाऱ्या प्रतिपूर्तिव्यतिरिक्त अधिकचा खर्च आल्यास सदर खर्चास वित्त विभागाची मान्यता देण्यात येत आहे.

७) उपरोक्त खर्च अन्न व नागरी पुरवठा विभागाच्या स्वीय प्रपंजी लेख्यातून (PLA) करण्यास तसेच सदर खर्चाची प्रतिपूर्ती वित्त विभागाकडून प्राप्त करून घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. मंमंप्र २०२०/प्र.क.३०/व्यय-१०, दि.१९/०५/२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२००७०११६४६०११६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manojkumar Manikrao Suryawanshi

Digitally signed by Manojkumar Manikrao Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f01fe9e39ec840cfd8aff420acfb85645316150fbe47d78667d211a870b6cad, serialNumber=171d531e2df977f0515a96704f71cb7e1b7622eae8ceb5547f27f39b9cdd96b0, cn=Manojkumar Manikrao Suryawanshi
Date: 2020.07.15 16:20:21 +05'30'

**( मनोजकुमार सुर्यवंशी )**
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहकसंरक्षण यांचेखाजगीसचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मंत्री, पणन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) अपरमुख्यसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव, कृषि व प.दु.म.विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधानसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को. ऑप. मार्केटिंग फेडरेशन लि., मुंबई.
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक. आदिवासी विकास भवन, २ रामाळा, रामगणेशगडकरीचौक, जुनाआग्रारोड,नाशिक-२,.
१९) सर्व विभागीय आयुक्त.
२०) नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
२१) सर्व जिल्हाधिकारी.
२२) सर्व उप आयुक्त (पुरवठा).
२३) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
२४) सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी.
२५) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२६) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२७) सर्व उपसचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी, अ.ना.पु. व ग्रा.सं. विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई.
२८) सरव्यवस्थापक, (महा.) भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, राजेंद्रनगर, दत्तपाडारोड, बोरीवली पूर्व मुंबई-०६६.
२९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ).
३०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वामजला, विधानभवन, मुंबई. (१०प्रती).
३१) मान्यता प्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये ( प्रत्येकी ५ प्रती ).
३२) सर्व विधानपरिषद सदस्य व विधानसभा सदस्य
३३) सर्व विरोधी पक्षनेते.
३४) निवडनस्ती (नापु-२९).